**राष्ट्रीय स्वास्थ विमा योजना बंद करण्यात आल्याने सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी स्थापन करण्यात आलेल्या समित्या रद्द करण्याबाबत व अंशदान स्वरुपात जमा असलेला निधी रिझर्व्ह बँक ऑफ इंडिया येथे जमा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक-रास्वायो-२०१२/प्र.क्र.२१९-भाग१/कामगार-७अ**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १६ एप्रिल, २०२५

**संदर्भ** :- १) शासन निर्णय क्र.असंका-२००७/(६७३)/कामगार-७ अ, दि. २४ मार्च २००८
२) शासन निर्णय क्र.असंका-२००७/(६७३)/कामगार-७ अ, दि. २४ मार्च २००८
३) शासन निर्णय क्र.सीएलए-२००८/(६७३)/कामगार-७ अ, दि. २८ मार्च २००८
४) शासन निर्णय क्र.रास्वावि-२००८/(८५५)/कामगार-७ अ, दि. १२ जूलै २००८
५) शासन निर्णय क्र.रास्वावि-२००८/(९३५)/कामगार-७ अ, दि. ३० सप्टेंबर २००८
६) शासन निर्णय क्र.रास्वावियो-२०११/प्र.क्र.३०८/कामगार-७ अ, दि. १९ मार्च २०१२
७) शासन निर्णय क्र. रास्वावियो-२०११/प्र.क्र.३०८/कामगार-७ अ, दि. २८ सप्टेंबर २०१२
८) शासन निर्णय क्र. रास्वावि-२०१९/प्र.क्र.७३/कामगार-७ अ, दि. ११ जून २०१९

**प्रस्तावना-**

केंद्र शासनाने दारिद्रय रेषेखालील असंघटित कामगारांसाठी राष्ट्रीय स्वास्थ विमा योजना दि.०१.१०.२००७ रोजी जाहिर केली होती. या अनुषंगाने राज्यात या केंद्रपुरस्कृत योजनेची अंमलबजावणी करण्यात आली. सदर योजने अंतर्गत केंद्र शासन प्रिमियम च्या ७५ टक्के व राज्यशासन २५ टक्के निधी प्रदान करणार होता. दरम्यानच्या कालावधीत केंद्रशासनाच्या श्रम आणि रोजगार मंत्रालय यांच्या १ एप्रिल २०१५ च्या कार्यकारी आदेशान्वये, सदर योजना ही कामगार व रोजगार मंत्रालयाकडून आरोग्य व कुंटूंब कल्याण मंत्रालयाकडे हस्तांतरित करण्यात आली. त्यामुळे या योजनेसंबंधीची सर्व कागदपत्रे या विभागाच्या दि. ११ जून २०१९ च्या शासन निर्णयान्वये सार्वजनिक आरोग्य विभागाकडे हस्तांतरित करण्याचा निर्णय घेण्यात आला. सदर योजनेची अंमलबजावणी कामगार विभागामार्फत होत नसल्याने उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णयान्वये स्थापन करण्यात आलेल्या विविध समित्या रदद करण्याबाबत वित्त विभागाने सुचित केलेले आहे. तसेच केंद्र शासनाचा हिस्सा म्हणून जमा असलेली रक्कम केंद्र शासनास प्रत्यार्पित करण्यात यावी व लाभार्थ्यांकडून अंशदान स्वरुपात जमा असलेली रक्कम रिझर्व्ह बँक ऑफ इंडिया मध्ये जमा करण्यात यावी. तसेच भंडारा व गोंदिया जिल्हयातील राष्ट्रीय स्वास्थ विमा योजनेच्या स्मार्ट कार्ड वाटपाची अंमलबजावणी बाबतचे मे. टाटा एआयजी कंपनीचे देयक अदा करुन व सनदी लेखापालाचे प्रलंबित देयक अदा करुन तसा अहवाल वित्त विभागास सादर करण्याबाबत सुचित केलेले आहे.

२. उपरोक्त प्रस्तावनेत नमुद केलेल्या बाबतीत निर्णय घेण्याबाबतची बाब विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय:</u>**

**असंघटित** क्षेत्रातील कामगारांसाठी केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय स्वास्थ विमा योजनेची अंमलबजावणी कामगार विभागामार्फत होत नसल्याने, यापूर्वी सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी स्थापन करण्यात आलेल्या खालील नमूद समित्या व या विभागाचे राष्ट्रीय स्वास्थ विमा योजनेच्या अंमलबजावणी बाबतचे शासन निर्णय या शासन निर्णयान्वये रद्द करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | समितीचे नाव | शासन निर्णय दिंनाक |
|---|---|---|
| I | राष्ट्रीय स्वास्थ विमा योजना, विकास आयुक्त (असंघटित कामगार) यांना नोडल एजन्सी म्हणून जाहिर करण्याबाबत. | दि. २४ मार्च २००८ |
| II | राष्ट्रीय स्वास्थ विमा योजना, विमा सहाय्यक कक्षाची स्थापना करणे. | दि. २४मार्च २००८ |
| III | राष्ट्रीय स्वास्थ विमा योजना राज्यात लागू करण्याबाबत. | दि. २८ मार्च २००८ |
| IV | राष्ट्रीय स्वास्थ विमा योजना आढावा समितीची स्थापना करणे. | दि. १२ जूलै २००८ |
| V | राष्ट्रीय स्वास्थ विमा योजना जिल्हास्तरीय अंमलबजावणी व आढावा समिती. | दि. ३० सप्टेंबर २००८ |
| VI | राष्ट्रीय स्वास्थ विमा योजना राज्यस्तरीय तक्रार निवारण समिती. | दि. १९ मार्च २०१२ |
| VII | राष्ट्रीय स्वास्थ विमा योजना जिल्हास्तरीय तक्रार निवारण समिती. | दि. २८ सप्टेंबर २०१२ |

उपरोक्त सर्व समित्या रद्द करण्यात येत आहेत.

२. केंद्र शासनाचा २,०९,९२,०९८/- रुपये (दोन कोटी नऊ लाख ब्याण्णव हजार अठ्ठ्याण्णव रुपये) इतका जमा स्वरुपात असलेला निधी केंद्र शासनास प्रत्यार्पित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. राष्ट्रीय स्वास्थ विमा योजनेअंतर्गत भंडारा व गोंदिया जिल्हयातील स्मार्ट कार्ड वाटपाच्या कामासाठी मे. टाटा एआयजी कंपनी लिमिटेड या कंपनीचे प्रलंबित असलेले रु.६८,६०,२८२/- इतके देयक अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच सनदी लेखापालाचे प्रलंबित असलेले रु.६४,०४५/- व रु. २८,०५३/- चे प्रलंबित देयक अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४. उपरोक्त प्रमाणे तसेच राज्य शासनाच्या लाभार्थ्यांकडून अंशदान स्वरुपात जमा असलेली रक्कम तात्काळ स्वरुपात रिझर्व्ह बँक ऑफ इंडिया मध्ये भरणे व योजनेचे खाते बंद करणे, लेखाशीर्ष बंद करणे नोडल एजन्सी बंद करणे, व उर्वरीत रक्कम रिझर्व्ह बँक ऑफ इंडिया मध्ये भरणे या बाबतीत विकास आयुक्त (असंघटित कामगार) यांनी तात्काळ कार्यवाही करावी व तसा अहवाल या विभागास सादर करावा.

५. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३३/दि. ३१.०१.२०२५ मध्ये दिलेल्या अभिप्रायास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२५०४१६१८२०११४६१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KARANSING PREMSING PATIL

Digitally signed by KARANSING PREMSING PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY LABOUR AND MINING DEPARTMENT, 2.5.4.20=6f2521c3a6d1f8429a3c2c9a42d575298ae82956908d63df441063695f377819, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C7FEED7178D6C14666A5DF36811F1763590E65B6F836A87E63789DC234173D66, cn=KARANSING PREMSING PATIL
Date: 2025.04.16 18:21:36 +05'30'

**( क. प्रे. पाटील )**
**अवर सचिव (कामगार)**
**महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई

२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.

३) मा.उप मुख्यमंत्री (नगर विकास व गृह निर्माण) महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, उप मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई.

४) मा.उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, उप मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई.

५) मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

६) मा. प्रधान सचिव (कामगार), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई

७) विकास आयुक्त (असंघटित कामगार) यांचे कार्यालय, प्रभादेवी, मुंबई-१३

८) कामगार आयुक्त, महाराष्ट्र राज्य मुंबई.

९) उप सचिव (कामगार-७ अ) उद्योग, ऊर्जा, खनिकर्म व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.

१०) निवडनस्ती (कामगार-७ अ), उद्योग, ऊर्जा, खनिकर्म व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.